उच्च व्यावसायिक व इयत्ता बारावीनंतरच्या सर्व अभ्यासक्रमामध्ये शिक्षण घेणाऱ्या राज्यातील गुणवत्ताधारक अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांकरीता शिष्यवृत्ती योजना

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्यांक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: अविवि -२०१४/प्र.क्र.००३/१४/कार्या-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- २९ जुलै, २०१५

**संदर्भ:-** १) अल्पसंख्यांक विकास विभाग,मंत्रालय,मुंबई, शासन निर्णय क्रमांक:अविवि २००९/ प्र.क्र. ४६ /०९/का.१,दि.५/२/२००९.
२) अल्पसंख्यांक विकास विभाग,मंत्रालय,मुंबई, शासन निर्णय क्रमांक:अविवि २०१०/ प्र.क्र. २१२ /०९/का.४,दि.३/२/२०१०.
३) अल्पसंख्यांक विकास विभाग,मंत्रालय,मुंबई, शासन निर्णय क्रमांक:अविवि २०१०/ प्र.क्र. ११२/१०/का.६,दिनांक-२२/०७/२०१०.
४) अल्पसंख्यांक विकास विभाग,मंत्रालय,मुंबई,शासन निर्णय, क्रमांक:अविवि २०११/ प्र.क्र. ४४ /११/का.६,दि.१४ ऑक्टोबर २०११.

**प्रस्तावना:-**

राज्य शासनाने अल्पसंख्यांक लोकसमूह म्हणून घोषित केलेल्या राज्यातील मुस्लीम, बौध्द , ख्रिश्चन, जैन, शीख व पारसी या समाजातील उच्च व्यावसायिक व इयत्ता १२ वी नंतर सर्व अभ्यासक्रमामध्ये शिक्षण घेणाऱ्या अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांकरीता शिष्यवृत्ती योजना संदर्भाधिन क्र.४ येथील शासन निर्णयान्वये राबविण्यात येत आहे. सदर शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत या योजनेचा लाभ घेण्यासाठी संबधित अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांच्या कुटूंबांच्या वार्षिक उत्पन्नाची मर्यादा रुपये २.५० लाख वरुन रुपये ६.०० लाख करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

उच्च व्यावसायिक व इयत्ता १२ वी नंतर सर्व अभ्यासक्रमामध्ये शिक्षण घेणाऱ्या राज्यातील अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांकरीता शिष्यवृत्ती योजनेंतर्गत संदर्भ क्र.४ येथे नमूद शासन निर्णयातील अटी व शर्ती मधील अ.क्र.६) येथे नमूद अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांच्या कुटुंबाची सर्व स्त्रोताद्वारे मिळणा-या वार्षिक उत्पन्नाची मर्यादा रुपये २.५० लाखावरुन रुपये ६.०० लाख करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

अल्पसंख्याक विद्यार्थ्यांना मागील वर्षी जी शिष्यवृत्ती ( केंद्रशासन पुरस्कृत मेरिट-कम-मिन्स किंवा उच्च व्यावसायिक व इयत्ता बारावीनंतरच्या सर्व अभ्यासक्रमामध्ये शिक्षण घेणाऱ्या राज्यातील गुणवत्ताधारक अल्पसंख्याक विद्यार्थ्यांकरीता राज्य शासनाची शिष्यवृत्ती ) मिळाली आहे, त्याच शिष्यवृत्तीसाठी विद्यार्थ्यांनी नूतनीकरणाचा अर्ज भरावा. संस्थेच्या प्राचार्यांनी नूतनीकरणाच्या सदर अर्जाची खात्री करुनच तो अर्ज ऑनलाईन पध्दतीने पुढे पाठवावा व विद्यार्थ्यांचा दुसऱ्या शिष्यवृत्तीचा अर्ज ऑनलाईन पध्दतीने पुढे पाठवू नये. योजनेच्या उर्वरीत सर्व अटी व शर्ती पूर्वीप्रमाणेच राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२९१६५४२१९४१४ असा आहे.हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नांवाने व आदेशानुसार

Ainul C Attar

Digitally signed by Ainul C Attar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ainul C Attar
Date: 2015.08.04 11:25:19 +05'30'

( अैनूल अत्तार )
सह सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३) मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
५) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
६) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
९) सर्व विभागीय आयुक्त,
१०) सर्व जिल्हाधिकारी
११) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१२) सर्व मंत्रालयीन विभाग
१३) संचालक, उच्च शिक्षण, मुंबई
१४) संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई
१५) संचालक, वैद्यकीय शिक्षण, मुंबई
१६) आयुक्त (पशुसंवर्धन),महाराष्ट्र राज्य,पुणे
१७) संचालक (शिक्षण ),शिक्षण संचालनालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
* १८) सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधान भवन,मुंबई
१९) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (प्रसिध्दीसाठी)
२०) निवडनस्ती.

* पत्राने